# त्रयोदश भीमरुपी स्तोत्रें

श्रीसमर्थ रामदासस्वामिंनी मारुती स्तोत्रे लिहिली ती एकूण तेरा. पण काहीजण ती बारा सांगतात तर काहीजण अकरा. अशा स्तोत्रातून उपास्य दैवताची स्तूती करुन त्यास आळविलेले असते; त्या दैवताने केलेल्या विविध शौर्यकथांचे, त्याच्या लीलांचे कौतुकयुक्त वर्णन केलेले असते. श्रीसमर्थकृत भीमरुपी त्रयोदश मारुतीस्तोत्रें ही, इ.स.१९१८ ला शंकर न. जोशी यानी संपादन केलेल्या 'श्रीसमर्थ रामदासांचे समग्र ग्रंथ' यातून घेतली असून त्यात आढळलेले पाठभेद वाचकांच्या सोयीसाठी म्हणून लाल अक्षरात कंसात तेथेच नमूद केले आहेत.त्याखाली त्यात आढळलेल्या कठिण शब्दांचा अर्थ मला जसा उमगला तसा दिला आहे. तसेच मुद्रणदोष असलेले शब्दहि लाल अक्षरातच दुरुस्त करुन दिलेले आहेत.**सर्व स्तोत्रे जास्तीत जास्त शुद्ध स्वरुपात देण्याचा येथे प्रयत्न केला आहे**. वाचकांनी आपल्याला जे योग्य वाटेल ते स्वीकारुन या स्तोत्रांचा भावार्थ आपल्या मनाशी करुन त्याचा आनंद घ्यावा आणि कृतकृत्य व्हावे हीच मनोकामना! प्रस्तुत संग्राहक हे श्रीसमर्थ साहित्याचे एक अभ्यासक आहेत, तेव्हा शब्दार्थात काही त्रुटि आढळल्यास ती त्यांच्या नजरेस आणून देऊन त्यांस उपकृत करावे अशी नम्र विनंति आहे. शब्दार्थासाठी www.dasbodh.com या संकेतस्थळावरील शब्दकोशाचा आधार मिळाला हे येथे नम्रपणे नमूद करतो.

## त्रयोदश भीमरुपी मारुती- स्तोत्रें

भीमरूपी महारुद्रा । वज्रहनुमान मारुती । वनारी अंजनीसूता । रामदूता प्रभंजना ॥१॥
महाबली प्राणदाता । सकळां ऊठवी बळें । सौख्यकारी (दुःखहारी)शोकहर्ता । धूर्त (दूत) वैष्णव गायका ॥२॥
दिनानाथा हरीरूपा । सुंदरा जगदंतरा । पाताल देवताहंता । भव्य शेंदूरलेपना ॥३॥
लोकनाथा जगन्नाथा । प्राणनाथा पुरातना । पुण्यवंता पुण्यशीला । पावना परतोषका ॥४॥
ध्वजांगे उचली बाहो । आवेशें लोटला पुढें । कालाग्नी कालरुद्राग्नी । देखतां कांपती भये ॥५॥
ब्रह्मांडें माईली नेणों । आवळें दंतपंगती । नेत्राग्नी चालिल्या ज्वाळा । भृकुटी ताठील्या बळें ॥६॥
पुच्छ तें मुरडिलें माथां । किरीटी कुंडलें वरी । सुवर्णकटिकांसोटी । घंटा किंकिणी नागरा ॥७॥
ठकारे पर्वता ऐसा । नेटका सडपातळू । चपलांग पाहतां मोठें । महाविद्युल्लतेपरी ॥८॥
कोटिच्या कोटि उड्डाणें । झेंपावे उत्तरेकडे । मंद्राद्रीसारिखा द्रोणू । क्रोधे उत्पाटिला बळें ॥९॥
आणिला मागुती नेला । आला गेला मनोगती । मनासी टाकिलें मागें । गतीसी तूळणा नसे ॥१०॥
अणूपासूनि ब्रह्मांडा । एवढा होत जातसे । तयासी तूळणा कोठे । मेरु मंदार धाकुटे ॥११॥
ब्रह्मांडाभोंवते वेढे । व्रज्रपुच्छें घालू (करुं) शके । तयासी तूळणा कैशी । ब्रह्मांडी पाहतां नसे ॥१२॥
आरक्त देखिलें डोळां । गिळिले (ग्रासिले) सूर्यमंडळा । वाढतां वाढतां वाढे । भेदिलें शून्यमंडळा ॥१३॥
भूतप्रेत समंधादि । रोगव्याधि समस्तहि । नासती तूटती चिंता । आनंदे भीमदर्शनें ॥१४॥
हे धरा पंधरा श्लोकी । लाभली शोभली बरी(भली) । दृढदेहो निसंदेहो । संख्या चंद्रकळा गुणें ॥१५॥
रामदासीं अग्रगण्यू । कपिकूळासी मंडणू । रामरुप अंतरात्मा । दर्शनें दोष नासती ॥१६॥
॥ भीमरूपी स्तोत्र संपूर्ण ॥१॥

शब्दार्थ:-१] **भीमरुपी-** महाकाय, २] **महारुद्र**-भगवान शंकराने प्रभू रामचंद्राच्या सेवेसाठी अनेक अवतार घेतले, त्यात हनुमानाचा अवतार अत्यंत महत्वाचा म्हणून तो "महारुद्र" होय ३]**वज्रहनुमान-** इंद्राने आपल्या वज्राने मारुतीच्या हनुवटीवर आघात करुन सूर्यबिंबाची सुटका केली तो वज्रहनुमान होय. ४] **वनारी-** सरसकट सर्व वनांचा नव्हे तर रावणाने सीतेस बंदी करुन ठेवलेल्या **केवळ अशोकवनाचाच विध्वंस करणारा** असा तो वनारी हनुमान. ५] **प्रभंजना-** वायु स्वरुप हनुमान ६] **महाबली-** अत्यंत बलवान व अतुलनिय असा ७] **प्राणदाता-** सजीव सृष्टीस प्राणदान करणारा वायुरुपी हनुमान, लक्ष्मण बेशुद्ध पडला असतां संजिवनी वनस्पती आणून त्याचे प्राण-रक्षण केले म्हणून प्राणदाता ८] **उठवीबळें-** आपल्या शक्तीच्या जोरावर अर्थात बळाने तो सर्वांना सचेत करतो. ९] **वैष्णव-** प्रभू श्रीरामरुपी विष्णुचा भक्त

तो वैष्णव किंवा स्वतः तोच जो विष्णुस्वरुप असतो तो वैष्णव होय.१०] **गायका-** प्रभू श्रीरामाचे गुणगान करणारा तो हनुमान ११] **हरीरूपा-** वानर रुपातील श्रीहरी चित्तहारक तो हनुमान १२] **जगदंतरा-** सर्व सजीव सृष्टीच्या अंतरंगात प्राणरुपाने वास करणारा १३] **शेंदूरलेपना-** त्यागनिदर्शक सिंदूराचे सर्वांगी लेपन केलेला १४] **लोकनाथा पुरातना-** मरुतरुप वायु तत्वावर आधारित सर्व सप्तलोक जगतात म्हणून त्यास 'लोकनाथा' असे संबोधले तर मरुततत्व हे ब्रह्मस्वरुप, चैतन्यशील आणि चिरंतन असे असून अत्यंत पुरातन असल्याने 'पुरातना' म्हंटले आहे १५]**पुण्यवंता-** जो देहाने पवित्र तो"**पुण्यवंता**'१६]**पुण्यशीला**-जो वाणीने पवित्र तो '**पुण्यशीला**"१७]**पावना-** जो मनाने पवित्र तो '**पावना**' १८] **परतोषका-** भक्तांसह इतराना संतोष देणारा तो १९] **ध्वजांगे**-प्रभू श्रीरामाच्या सैन्याचा ध्वज स्वतः श्रीहनुमानाने पेलला. १९] **काळाग्नि काळरुद्राग्नि-** यमदूत २०] **ब्रह्मांडे माईली-** जणू सारे ब्रह्मांड श्रीहनुमानाचे मुखात मावेल असे रुद्र तथा अक्राळ विक्राळ स्वरुप. २१] **सुवर्ण कटि कासोटी**-कंबरेला सुवर्णयुक्त कासोटी कसलेली २२]**महाविद्युल्लतेपरी**-एखाद्या प्रचंडविद्युतलोळाप्रमाणे चपळ २३] **उत्पाटिला**-उपटून टाकला २४] **मागुती नेला-** परत माघारी जेथे होता तेथे नेउन ठेवला.२५] **आरक्त-** रक्तवर्णी २६] **भेदिले शून्यमंडळा-** बाल हनुमान ज्ञानस्वरुप विष्णुभक्त होते,त्यामुळे त्यांनी शून्य वादाचा निरास केला.(अनेक साधक ब्रह्मचिंतन करीत असता शून्यवादात अडकण्याचा संभव असतो) **शून्यमंडळ**-आकाश २७] **पंधरा-श्लोकी-** श्रीहनुमानाचा जन्म पौर्णिमेस झाला म्हणून हे पंधराश्लोक, तद्वत चंद्राच्या १५ कलाप्रमाणे हे १५ श्लोक होत.२८]**भीमदर्शने**-मारुतीच्या दर्शनाने २९] **अग्रगण्यु**-सर्वश्रेष्ठ. ३०] **मंडणू**-भूषण,३१]**रामरुप अंतरात्मा-** ज्याच्या अंतरंगात प्रभूश्रीरामाचे सतत चिंतन आणि भजन चालू असते असा तो मारुती. पाठभेद-**रामरुपी म्हणजे ज्याचे अंतरंग रामस्वरुप झाले आहे तो.**

**[२]**

**६] जनीं ते अंजनी माता । जन्मली ईश्वरी तनू । तनू मनू तो पवनू । एकची पाहता दिसे ॥१॥**
**त्रैलोक्यीं पाहतां बाळे । ऐसें तों पाहतां नसे । अतूल तुलना नाही । मारुती वातनंदनू ॥२॥**
**चळे ते चंचळे नेटें । बाळ मोवाळ साजिरें । चळताहे चळवळी । बाळ लोवाळ गोजिरें ॥३॥**
**हात कीं पाय की सांगों । नखे बोटें परोपरी । दृष्टीचें देखणें मोठें । लांगूळ ळळलळीतसे ॥४॥**
**खडीखाडी (खारी) दडे तैसा । पीळ पेच परोपरी । उड्डाण पाहतां मोठें । झेंपावे रविमंडळा ॥५॥**
**बाळानें गिळिला बाळू । स्वभावें खेळतां पहा । आरक्त पीत वाटोळे । देखिले धरणीवरी ॥६॥**
**पूर्वेसि देखतां तेथें । उडालें पावलें बळें । पाहिलें देखिलें हातीं । गिळिलें जाळिलें बहू ॥७॥**
**थुंकोनि टाकितां तेथें । युद्ध जालें परोपरी । उपरी ताडिला तेणें । एक नामचि पावला ॥८॥**
**हा गिरी तो गिरी पाहे । गुप्त राहे तरुवरी । मागुता प्रगटे धांवे । झेंपावें गगनोपरी ॥९॥**
**पळही राहिना कोठें । बळेंचि (चालितो) घालितां झडा । कडाडां मोडती झाडें । वाडवाडें उलंडती ॥१०॥**
**पवनासारिखा धांवे । वावरे विवरे बहू । अपूर्व बाळलीला हे । रामदास्य करी पुढें ॥११॥**
**॥ भीमरूपी स्तोत्र संपूर्ण ॥२॥**

शब्दार्थ:१] **तनू मनू-** देहाने आणि मनाने २] **पवनू-** हनुमंत ३] **वातनंदनू**-वायुपुत्र हनुमान ४] **चळे**-हालचाल केली, जागा सोडली ५] **चंचळे नेटे-** आपल्या बळाच्या जोरावर त्या चळवळ्या/खोडकर बाळाने ६] **मोवाळ-** मवाळ,मऊ ७]**चळताहे** - वेगाने हालचाल करीत आहे, ८] **चळवळी-** खोडकर ९]**लोवाळ गोजिरे**-साजिरे गोजिरे,सुंदर १०] **लांगूळ-** शेपूट ११] **ळळलळीतसे-** वळवळ करीत असे १२] **खडीखाडी दडे-** खडकाआड किंवा खाडीत लपून बसे किंवा 'खडी-**खारी'म्हणजे जशा खारी खडकात दडून बसतात तसे** १३] **पीळ पेच-** अत्यंत कठीण असे न सुटणारे कोडे १४] **परोपरी-** संपूर्णतः, पूर्ण ताकदीनिशि १५] **रविमंडळा**-सूर्यमंडळाकडे १६] **बाळाने-** हनुमानाने १७] **बाळू-** उगवणारा सूर्य १८] **स्वभावे-** सहजपणे १९] **आरक्त**-लालसर २०] **पीत**-पिवळसर २१] **वाटोळे-** गोल, वर्तुळाकार २२] **बळें-** आपल्या शक्तिच्या जोरावर २३] **गिरी-** डोंगर २४] **तरु-** झाडे २५] **मागुता-** मागाहून २६] **नामचि पावला-** पवनपुत्राच्या हनुवटीवर वज्राचा आघात झाला म्हणून हनुमान या नावाने प्रसिद्ध झाला २७] **झडा**-वेगाने झडप घालणे,उडी मारणे किंवा 'चालितो झडा' म्हणजे वेगाने चालू लागला तर २८] **वाडवाडे-** मोठीघरे २९] **वावरे विवरे-**

इकडे तिकडे हिंडे/फिरे ३०] **रामदास्य करी**- रामाची सेवा करतो.

[३]

५] कोपला रुद्र जे काळीं । ते काळीं पाहवेचिना । बोलणे चालणे कैंचें । ब्रह्मकल्पांत मांडला ॥१॥
ब्रह्मांडाहून जो मोठा । स्थूळ उंच भयानकू । पुच्छ तें मुर्डिले माथां । पाऊल शून्यमंडळा ॥२॥
त्याहून उंच वज्राचा । सव्य बाहो उभारिला । त्यापुढें दुसरा कैंचा । अद्भूत तुळना नसे ॥३॥
मार्तंडमंडळाऐसे । दोन्ही पिंगाक्ष ताविले । कर्करा घर्डिल्या दाढा । उभे रोमांच ऊठिले ॥४॥
अद्भूत गर्जना केली । मेघची वोळले भुमीं । तुटले गिरिचे गाभे । फूटले सिंधु आटले ॥५॥
अद्भूत वेश आवेशें कोपला रणकर्कशू । धर्मसंस्थापनेसाठीं । दास तो ऊठिला बळें ॥६॥
॥ भीमरूपी स्तोत्र संपूर्ण ॥३॥

शब्दार्थ:१]**कोपला**-क्रोधीत झाला २] **रुद्र**- रैवत,अज,भीम,भव,वाम,वृषाकपि,अजैकपाद,उग्र,अहिर्बुध्न्य,बहुरुप,महान असे हे ११रुद्र अर्थात शंकराचे अवतार होत ३] **ब्रह्मकल्पांत**- रुद्र हनुमान क्रोधायमान झाल्यावर जणू काही या सृष्टीचा विनाशकाळच जवळ आला आहे असे वाटले.४] **सव्य बाहो**-उजवा हात ५] **अद्भूत**- आश्चर्यकारक ६] **मार्तंड मंडळाऐसे**-सूर्यमंडळाप्रमाणे ७] **पिंगाक्ष**- लालबुंद डोळे ८] **कर्करा**-कराकरा ९] **घर्डिल्या**-घासल्या १०] **मेघची वोळले**-हनुमंतावर मेघ प्रसन्न झाले नि ते त्याच्या मदतीस धावले असा भावार्थ.११] **तुटले गिरिचे गाभे** -अतिवृष्टीने गिरीकंदर सपाट झाले अर्थात हाहाकार माजला.१२] **फूटले सिंधू आटले**- गिरीकंदराच्या फूटण्यामुळे सागराने मर्यादा सोडली आणि तो सागर जणूकाही आटण्याच्या मार्गाला लागला असे भासले. १३] **रणकर्कशू**- रणात आकांडतांडव करणारा तो रुद्र मारुति.

[४]

अंजनीसुत प्रचंड । वज्रपुच्छ कालदंड । शक्ति पाहातां वितंड । दैत्य मारिले उदंड ॥१॥
धगधगी तसी कळा । वितंड शक्ति चंचळा ।चळचळीतसे लिळा । प्रचंड भीम आगळा ॥२॥
उदंड वाढला असे । विराट धाकुटा दिसे । त्यजून सूर्यमंडळा । नभांत भीम आगळा ॥३॥
लुलीत बाळकी लिळा । गिळोनि सूर्यमंडळा । बहुत पोळतां क्षणीं । थुंकिला तो ततक्षणीं ॥४॥
धगधगीत बूबळा । प्रत्यक्ष सूर्यमंडळा । कराळ काळमूख तो । रिपुकुळासि दुःख तो ॥५॥
रुपें कपी अचाट हा । सुवर्ण कट्ट कासतो । फिरे उदास दास तो । खळास काळ भासतो ॥६॥
झळक झळक दामिनी । वितंड काळ कामिनी । तयापरी झळाझळी । लुलित रोमजावळी ॥७॥
समस्त प्राणनाथ रे । करी जना सनाथ रें । अतूळ तूळणा नसे । अतूळशक्ति वीलसे ॥८॥
रुपें रसाळ बाळकू । समस्त चित्त चाळकू । कपी परंतु ईश्वरू । विशेष लाधला वरू ॥९॥
स्वरुद्र क्षोभल्यावरी । त्यासि कोण सांवरी । गुणागळा परोपरी । सतेजरुप ईश्वरी ॥१०॥
समर्थ दास हा भला । कपीकुळांत शोभला । सुरारिकाळ क्षोभला । त्रिकूट जिंकिला भला ॥११॥
॥ भीमरूपी स्तोत्र संपूर्ण ॥४॥

**शब्दार्थ: १] अंजनीसुत**-अंजनीचा पुत्र हनुमंत २] **वज्रपुच्छ** -वज्राप्रमाणे महाकठिण शेपटी ३] **कालदंड**-मृत्युचा सोटा, मृत्युदंड ४] **वितंड**- भयानक, भयंकर, ५] **धगधगी**- अत्यंत उष्ण, रागाने लालबुंद झालेला ६] **कळा**-अवस्था ७] **चंचळा**- अत्यंत चपळ ८]**चळचळीतसे लिळा**- त्याची लिळा [खेळ] अर्थात किमया चळचळीत अशी असते.९] **बिराट धाकुटा**-बिराट[क्षणात?] लहान होतो.१०] (अ)**लुलीत**-खोडकर,(शब्दकोशात 'अलुलीत'आहे) ११] **बाळकी लिळा**- लुलीत बाळाची विस्मयकारक लिला १२] **ततक्षणी**- त्याचवेळी,लगेच,ताबडतोब १३] **कराळ**- महाभयानक १४] **काळमुख**-मत्युचेद्वार १५] **रिपुकुळासि**-शत्रुजातीस १६] **रुपें**- देहाने १७] **कपी**-वानर १८] **कट्ट**- कमरेला बांधलेला पट्टा १९] **खळ**-दुष्ट २०] **काळ**-मत्यु २१] **झळक**-चमकणारी २२] **दामिनी**-सौदामिनी,वीज २३] **काळ कामिनी**-मृत्युदेवता २४] **लुलित रोमजावळी**- "खोड्यांमुळे त्वचेवर रोमांच उभारुन आले" असा अर्थ होईल का? जसे अवळीजावळी तसे रोमजावळी

**२५] अतूळ-** तुलना करता येणार नाही अशी २६] **लाधला**-मिळाला,प्राप्त झाला २७] **चाळकू**-चाळविणारा, मनमोहक २८] **वरु**- वर,कृपाप्रसाद २९] **स्वरुद्र**-स्वतः रुद्रच,शंकर २९] **क्षोभल्यावरी**- प्रक्षुब्ध / क्रोधायमान झाल्यावर ३०] **गुणा गळा**-गुणाने आगळा वेगळा ३१] **सुरारिकाळ**- दानवांचा/राक्षसांचा शत्रू ३२] **त्रिकूट**- इडा,पिंगला व सुषुम्ना या तिहींचा ऐक्यभाव,तीनकूट/व्यक्ति,त्रिकूटाचळ, अचळ-पर्वत,श्रीलंका,(कूट-गूढ,अवस्था,पृथ्वि,स्वर्ग,पाताळ ही तीनभुवने किंवा सत्व,रज,तम या त्रिगुणाना जिंकून शुद्धसत्वयुक्त हनुमान असाही अर्थ होईल.)३२] **भला**-संतजन,सज्जन.

**[५]**

**२] हनुमंता रामदूता । वायुपुत्रा महाबला । ब्रह्मचारी कपीनाथा । विश्वंभरा जगत्पते ॥१॥**
**दानवारी कामांतका । शोकहारी दयानिधे । महारुद्रा मुख्य प्राणा । मूळमूर्ती पुरातना ॥२॥**
**वज्रदेही सौख्यकारी । भीमरुपा प्रभंजना । पंचभूतां मूळमाया । तूंचि कर्ता समस्तहि ॥३॥**
**स्थितीरुपें तूंचि विष्णू । संहारक पशूपते । परात्परा स्वयंज्योती । नामरुपा गुणातिता ॥४॥**
**सांगतां वर्णितां येना । वेदशास्त्रा पडे ठका । शेष तो शिणला भारी । नेति नेति परा श्रुती ॥५॥**
**धन्यावतार कैसा हा । भक्तांलागिं परोपरी । रामकाजीं उतावेळा । भक्तां रक्षक सारथी ॥६॥**
**वारितो दुर्घटे मोठीं । संकटीं धांवतो त्वरें । दयाळ हा पूर्ण दाता । नाम घेतांच पावतो ॥७॥**
**धीर वीर कपी मोठा । मागे नव्हेचि सर्वथा । उड्डाण अद्भूत ज्याचें । लंघिलें समुद्राजळा ॥८॥**
**देउनी लिखिता हातीं । नमस्कारी सितावरा । वाचितां सौमित्र अंगे । राम सुखें सुखावला ॥९॥**
**गर्जती स्वानंदमेळीं । ब्रह्मानंदें सकळहि । अपार महिमा मोठा । ब्रह्मादिकांसि नाकळे ॥१०॥**
**अद्भूत पुच्छ तें कैसें । भोवंडी नभ पोकळीं । फांकले तेज तें भारी । झांकिलें सूर्यमंडळा ॥११॥**
**देखतां रुप पैं ज्याचें । उड्डाण अद्भूत शोभलें । ध्वजांग ऊर्ध्व तो बाहु । वामहस्त कटावरी ॥१२॥**
**कसिली हेमकासोटी । घंटा किंकिण भोंवत्या । मेखळे जडलीं मुक्तें । दिव्य रत्नें परोपरी ॥१३॥**
**माथा मुगुट तो कैसा । कोटि चंद्रार्क लोपले । कुंडले दिव्य तीं कानीं । मुक्तामाला विराजते ॥१४॥**
**केशर रेखिलें भाळी । मुख सुहास्य चांगलें । मुद्रिका शोभती बोटीं । कंकणें कर मंडित ॥१५॥**
**चरणीं वाजती अंदू । पदीं तोडर गर्जती । कैवारी नाथ दिनाचा । स्वामि कैवल्यदायकू ॥१६॥**
**स्मरतां पाविजे मुक्ती । जन्ममृत्यूसि वारितो । कांपती दैत्य तेजासी । भुभु:कार देतां बळें ॥१७॥**
**पाडितो राक्षसू नेटें । आपटी महिमंडळा । सौमित्रप्राणदाताची । कपिकूळांत मंडणू ॥१८॥**
**दंडिली पाताळ शक्ती । अहीमही निर्दाळिले । सोडिले रामचंद्रा । कीर्ति हे भुवनत्रयीं ॥१९॥**
**विख्यात ब्रीद तें कैसें । मोक्षदाता चिरंजिवी । कल्याण त्याचेनि नामें । भूत पीशाच्च कांपती ॥२०॥**
**सर्पवृश्चिक पश्वादी । विष शीत निवारण । आवडी स्मरतां भावें । काळ कृतांत धाकतो ॥२१॥**
**संकटें बंधनें बाधा । दुःखदरिद्र नाशका । ब्रह्मग्रहपिडाव्याधी । ब्रह्महत्यादि पातकें ॥२२॥**
**पुरवी सकळहि आशा । भक्तकामकल्पतरू । त्रिकाळीं पठतां स्तोत्र । इच्छिले पावसी जनीं ॥२३॥**
**परंतु पाहिजे भक्ती । संधी कांही धरूं नका । रामदासा सहाकारी । सांभाळीतो परोपरी ॥२४॥**
**॥ भीमरूपी स्तोत्र संपूर्ण ॥५॥**

**शब्दार्थ: १] कपीनाथा-** वानरांच्या नाथा २] **दानवारी**-दानवांचा अरी/काळ ३] **कामांतका-** वासनेचा अंत करणारा ४] **शोकहारी-** दुःखाचे हरण करणारा ५] **दयानिधे-** करुणासागर,दयाळु ६] **मुख्य प्राणा**-पंचप्राणापैकी मुख्यप्राण तो मरुत ७] **मूळमूर्ती-** मूळ ब्रह्मस्वरुपातील मूर्त रुप ८] **वज्रदेही**-वज्रासारख्या अतिकठीण देहाचा ९] **भीमरुपा**-महाकाय रुपाचा १०] **पंचभूता**-पांचभौतिक ११] **मूळमाया**-चंचळब्रह्मस्वरुप,सगुण स्वरुप १२] **परात्पर-** थोराहून थोरगुरु, १३] **गुणातिता-** त्रिगुणांच्या पार असलेला १४] **ठका**-कोडे,प्रश्न,१५] **रामकाजी-** श्रीरामाच्या कामकाजासाठी १६] **वारितो-** निवारण १७] **दुर्घटे**-संकटे १८] **लंघिलें-** ओलांडले, उल्लंघन केले १९] **लिखिता**-लखोटा २०] **सितावरा**-श्रीराम २१] **सौमित्र**-लक्ष्मण २२] **स्वानंदमेळी-** स्वानंदात बुडालेला जमाव २३] भोवंडी-गरागरा चक्कर मारणे २४] **नभ पोकळी-** आकाशाच्या पोकळीत २५] **ध्वजांग** -ध्वज घेतलेला २६] **उर्ध्व तो बाहू-** हात उंच उभारलेला असे २७] **वामहस्त-**

डावा हात २८] **कटावरी**-कंबरेवर, पाठभेद- कटीवरी २९] **मेखले**- करदोड्यात ३०] **मुक्ते**- मोत्यांनी ३१] **मुद्रिका**- अंगठी ३२] **कर मंडित**- हातास भूषवत आहेत/शोभा आणत आहेत.३२] **अंदू**- पैजण,साखळ्या ३३]**तोडर**- तोडे ३४] **महिमंडळा**- अहिमहीमंडळी ३५] **सौमित्रप्राणदाताची**- लक्ष्मण बेशुद्ध पडल्यावर त्यास द्रोणागिरी आणून औषधाची व्यवस्था करुन त्याचे प्राण वाचविले म्हणून प्राणदाता ३६] **कृतांत**- यमराज,३७] **कल्पतरु** - सर्व इच्छांची पूर्ती करणारा वृक्ष.३७] **संधी**- शंकाकुशंका, पाठभेद-संधे ३८] **रामदासा सहाकारी**-रामदासास मदत करणारा तो प्रभूश्रीराम. **३९] परोपरी**- महत्प्रयासाने, काय वाटेल ते झाले तरी.

[६]

**१२] कपि विर उठला तो वेग अद्भूत केला । त्रिभुवनजनलोकीं कीर्तिचा घोष केला ।**
**रघुपति उपकारें दाटलें थोर भावें(भारे) । परमविर (धीर) उदारें रक्षिले सौख्यकारें ॥१॥**
**सबळ दळ मिळाले युद्ध उदंड झालें । कपिकटक निमाले पाहतां येश गेले ।**
**परदळ शरघातें कोटिच्या कोटि प्रेते । अभिनव रणपातें दुःख बीभीषणातें ॥२॥**
**कपिरिसघनदाटी जाहली थोर आटी । म्हणौनि जगजेठी धांवणें चारि कोटी ।**
**मृतिविरहित ठेले मोकळे सिद्ध झाले । सकळ जनु निवाले धन्य सामर्थ्य चाले ॥३॥**
**बहू प्रिय रघुनाथा मुख्य तुं प्राणनाथा । उठवी मज अनाथा दूर सांडूनि वेथा ।**
**झडकरिं भिमराया तुं करी दृढ (वज्र) काया । रघुविरभजना या लागवेगेंचि जाया ॥४॥**
**तुजविण मज पाहे पाहतां कोण आहे । म्हणउनि मन माझे रे तुझी वाट पाहे ।**
**मज तुज निरवीलें पाहिलें आठवीलें । सकळिक निजदासालागिं सांभाळवीलें ॥५॥**
**उचित हित करावे उद्धरावें धरावें । अनहित न करावें त्वा जनीं येश घ्यावें ।**
**अघटित घडवावें सेवका सोडवावे । हरिभजन घडावें दुःख तें बीघडावें ॥६॥**
**प्रभूवर विरराया जाहली दृढ (वज्र) काया । परदळ निवटाया दैत्यकूळें कुटाया ।**
**गिरिवर उगटाया (उतटाया) रम्यवेषें नटाया । तुजचि अलगटाया ठेविलें मुख्य ठाया ॥७॥**
**बहुत सबळ सांठा मागतो अल्प वांटा । न करित हित कांठा थोर होईल ताठा ।**
**कृपणपण नसावें भव्य लोकीं दिसावें । अनुदिन करुणेचे चिन्ह पोटीं वसावें ॥८॥**
**जळधर करुणेचा अंतरामाजि राहें । तरि तुज करुणा हे कां नये सांग पां हे ।**
**कठिण हृदय जालें काय कारुण्य गेलें । न पवसि मज कां रे म्या तुझें काय केलें ॥९॥**
**वडिलपण करावें सेवका सांवरावें । अनहित न करावें तूर्त हाती धरावें ।**
**निपटचि हटवादें प्राथिला शब्दभेदें । कपि घन करुणेचा वोळला रामवेधें ॥१०॥**
**बहूतचि करुणा या लोटली देवराया । सहजचि कपिकेतें जाहली दृढ (वज्र) काया ।**
**परम सुख विलासे सर्वदासानुदासे । पवनतनुज तोषें वंदिले सावकाशे ॥११॥**
**॥ भीमरूपी स्तोत्र संपूर्ण ॥६॥**

**शब्दार्थ: पाठभेद-१]** फणिवर उठवीला, **भगवान विष्णुचा अवतार प्रभू श्रीरामाने मारुतीरायास प्रवृत्त केले अशा अर्थाने २] वेग अद्भूत**- आश्चर्यकारक अशा वेगाने **३] धीर**- ज्याने आपली इंद्रिये अंतर्मुख केली आहेत असा बुद्धिमान पुरुष अर्थात हनुमान.**४]परदळ**-शत्रुसैन्य ५] **कपिकटक**- वानरसैन्य ६] **शरघाते**-बाणांच्या वर्षावाने ७] **रणपाते**- रणातील संहाराने ८] **कपिरिसघनदाटी**-वानरकूळास अफाट राग आल्याने,कपि= वानर,रिस= राग,क्रोध, चीड ९] **चारि कोटी**- चार प्रकारच्या खाणीतून, सर्वत्र संचार करुन १०] **मृतिविरहित**- मृत्युविरहित अर्थात मरणासन्न,=घायाळ असा अर्थ होईल का? ११] **परदळ निवटाया**- शत्रुसैन्याच्या निप्पातासाठी, निवटाया= निपटण्यास १२] **गिरिवर**- द्रोणागिरी, **१३] उगटाया**- उतटाया अर्थात उपटण्यासाठी १४] **अलगटाया**- अलिंगण देण्यासाठी १५] **सबळ सांठा**-कृपेची भरपूर साठवण,दयाघन १६] **कृपणपण**- कंजुषपणा १७] **जळधर**-जलधर,मेघ,१८] **वडिलपण करावे**- मोठ्या मनाने आणि वडिलकीच्या नात्याने करावे १९] **सांवरावे**- सांभाळून घ्यावे.२०] **निपटचि**- संपूर्ण,सगळा,केवळ,अगदीच,२१] **हटवादे**-हट्टाने २२] **शब्दभेदें** -शब्दफरकाने २३] **रामवेधें**- प्रभूश्रीरामाच्या प्रार्थनेने

२४] **वोळला**- प्रसन्न झाला २५] **कपिकेते-** हनुमंतामुळें, पाठभेद-कफकेते-कफाच्या व्याधीतून मुक्त होऊन असा अर्थ घ्यावा लागेल.२६] **सर्वसानुदासे**- सर्व दास(शिष्य)आणि त्यांच्या अनुदासांच्या (प्रशिष्यांच्या) सेवेमुळे, २७] **पवन तनुज-** हनुमान,वायुपुत्र २८] **तोषे-** समाधानाने, प्रसन्न मनाने २९] **वंदिले**- वंदन केले.

**[७]**

**१३] रुद्र हा समुद्र देखतांक्षणीं उठावला । शिराणिचें किराण सज्ज त्रीकूटास पावला ।**
**वात जातसे तसाचि स्थूळ देह राहिला । नावरोनि वीवरोनि तो त्रिकूट पाहिला ॥१॥**
**हीन देव दीनरूप देखतांचि पावला । गड्गडित घड्घडित कड्कडित कोपला ।**
**लाटि कूटि पाडि फोडि झोडि झोलि झोडला । दैत्यलोक एक हाक सर्व गर्व मोडिला ॥२॥**
**सानरूप तें स्वरूप गुप्तरुप बैसला । (पुच्छकेत)कपीकेत शोध घेत त्रीकूटांत बैसला ।**
**गडगडी दिसेचिना बुझेल कोण कैसला । वळावळी चळाचळी विशाळ ज्वाळ जैसला ॥३॥**
**काळदंडसे प्रचंड ते वितंड जातसे । भारभार राजभार पुच्छमार होतसे ।**
**पाडिले पछाडिले रुधीरपूर व्हातसे । दैत्य बोलती बळें पळोन काय घ्यातसे ॥४॥**
**काळकूट तें त्रिकूट धूट धूट ऊठिलें । दाट थाट लाट लाट कूट कूट कूटिलें ।**
**घोरमार तें भुमार लूट लूट लूटिले । चिर्डिलेचि घर्डिलेचि फूट फूट फुटलें ॥५॥**
**दाट थाट आटघाट तें कपाट घातलें । सर्व रोध तें निरोध थोर दुःख पावले ।**
**सैन्य कट्ट त्यासि घट्ट कर्करून बांधिलें । थोर घात त्यांस पात चर्फडीत चेंदलें ॥६॥**
**वज्र पुच्छ त्यासि तुच्छ मानिलें निशाचरीं । सर्वही खणखणाट ऊठिले घरोघरीं ।**
**फुटेचिना तुटेचिना समस्त भागले करीं । लटलटीत कांपती बहूत धाक अंतरीं ॥७॥**
**थोर थोर दुर दूर दाट दाट दाटलें । कोट(कोण) मस्त तंग वस्त थाट थाट थाटलें ।**
**मंदिरीं घरोघरीं अचाट पुच्छ वाटलें (वाढले) । दैत्यनास तो घसास काट काट काटले ॥८॥**
**हात पाय मान माज वोढितें पछाडितें । अडचणींत अडकवूनि पीळ पेंच काढितें ।**
**लोहदंडसें अखंड राक्षसासि ताडितें । मूळ जाळ व्याळ जाळ दैत्यकूळ नाडिते ॥९॥**
**थोर धाक एक हाक त्रीकुटांत पावलें । घरोघरीच चळवळी पुढें उदंड ऊरलें ।**
**बैसलें उदंड दैत्य तें सभेत घूसले । सभा विटंबिली बळेचि कोणसें न सूचलें ॥१०॥**
**देह मात्र एक सूत्र थोर यंत्र हालले । पुरोनि ऊरलें बळें सभेमधेंचि चालिले ।**
**रत्नदीप तेलदीप तेज सर्व काढिलें । लाटिकूटि धामधूम पाडिलें पछाडिले ॥११॥**
**गुप्तरूप मारुती दशाननाकडे भरे । मुगूट पाडिला शिरी कठोर वज्र ठोंसरे ।**
**सभा विटंबिली बळेंचि गर्गरीत वावरे । बलाढ्य दैत्य मारिले कठिण पुच्छ नावरे ॥१२॥**
**हस्तमार दैत्यमार दंडमार होतसे । लंडसे कलंडले उलंडलेचि भंडसे ।**
**येत येत पुच्छकेत दैत्य सर्व बोलती । गळीत बैसले भुमीं न बोलती न चालती ॥१३॥**
**स्वप्नहेत सौख्य देत दैत्यघात भावला । रुद्र हा उठावला कुडावयासि पावला ।**
**जाळिलें त्रिकूट नीट आपटून रावणीं । राक्षसांसि थोर दुःख ऊसनें ततक्षणीं॥१४॥**
**दीनरूप देव सर्व हें स्वरूप (हास्यरुप) पाहिलें । कळवळून अंतरीं रघुत्तमासि वाहिलें ।**
**एक वीर तो सधीर थोर धीर उठला । तोष तोष तो विशेष अंतरींच दाटला ॥१५॥**
**उदंड देव आटिले तयांसि भीम आटितो । रामदूत वातसूत लाटिलाटि लाटितो ।**
**ऊठ आमुचे समस्त कूट कूट कूटितो । धूट धूट दैत्य त्यास लूट लूट लूटितो ॥१६॥**
**समस्त दैत्य आळितो बळें त्रिकूट जाळितो । पुरांत गोपुरें बरीं निशाचरांसि वाळितो ।**
**उदंड अग्नि लाविला बहू बळें उठावला । कडाडिला तडाडिला भडाडिला धडाडिला ॥१७॥**
**उदंड जाळिलीं घरें कितेक भार खेंचरें । किलाल धांवती भरें सुरांस वाटलें बरें ।**
**उदंड (वितंड) दैत्य धांवडी तयांत पुच्छ भोंवडी । कडाकडी खडाखडी गडागडी घडाघडी ॥१८॥**

बळें चपेट मारिला उदंड दैत्य हारिला । तरारिला थरारिला भयंकरूं भरारिला ।
गद्गदी तनू वितंड सागरी सरारिला । जानकीस भेटला प्रभूकडे सरारिला ॥१९॥
काळसे विशाळ दैत्य त्यांत एकला भरें । थोर धाक एक हाक काळचक्र वावरे ।
शक्ति शोधिली बळेंचि भव्य देखिले धुरे । वानरांसहित रामदास भेटले त्वरें ॥२०॥
॥ भीमरूपी स्तोत्र संपूर्ण ॥७॥

**शब्दार्थ: १] शिराणि-** अपूर्वत्व, दुर्मिळता,अलभ्यत्व,थोर लाभ,दुर्लभता,कौतुक **२] किराण**-उडी **३] त्रिकूट**-इडा,पिंगळा, सुषुम्ना यांचे ऐक्य अर्थात कुंडलिनी, श्रीलंका ४] हीन देव दीनरूप- रावणाने बंदिवासात ठेवल्यामुळे हिन नि दीन झालेले देव पाहून त्यांचेवर प्रसन्न झाला, देव='प्रकाश'असाहि अर्थ आहे ५] **दैत्यलोक-** दैत्यवंश ६] **सानरुप**-लघुरुप ७] **पुच्छकेत**- हनुमान ८] **गडगडी**- गडावर आंत-बाहेर, ९] **बुझेल कोण**- गुप्तरुप असल्याने कोण घाबरेल बरे ! १०] **विशाल ज्वाळ**- अवाढव्य अत्यंत तेजस्वी असा, ११] **काळदंड-** मृत्युपाश **१२] पुच्छमार-** शेपटीचे भयानक तडाखे **१३] घोरमार** - असह्य मार, १४] **भुमार**-जमिनीवर आपटणे १५] **सैन्य कट्ट**- सैन्यांच्या कंबरेला १६] **निशाचरी**- रात्री भटकणारे १७] **धाक अंतरी**-मनातून घाबरलेले १८] **कोट मस्त**- तटबंदी एकदम छान किंवा कोण मस्त म्हणजे कोणीकोणी अत्यंत मस्तवाल असे १९] घसास- धसास, पुरेपूर, शेवटपर्यंत, २०] **मान माज**- मान व कंबर २१] **लोहदंड**- सळ्या २२]**व्याळ जाळ** -कंबरपट्ट्यापर्यंत आगीचे लोळ, **२३] हस्तमार** -हाताने बुक्क्यांचा मार,**२४]दैत्यमार-** राक्षसी मार, **२५] दंडमार-** दंडुक्याचा मार, **२६] ततक्षणी-** त्याचवेळी **२७] हे स्वरुप- किंवा** हास्यरुप **२८] सधीर-** धीरासह २९] **किलाल**- रक्ताळलेले सैन्य, ३०] **सुरास**- देवगणास ३१] **वितंड** - भयानक ३२] **सरारिला**- वेगाने गेला. ३३] **काळसे**- काळासारखे, मृत्युसारखे ३४] **विशाळ**- अतिशय मोठे ३५] **काळ चक्र**- मृत्युचा फेरा ३६] **धुरे-** आधारस्तंभ, जबाबदार सांभाळणारे, प्रमुख. ३७] **रामदास**- प्रभू श्रीरामाचा दास तो हनुमंत.

[८]

११] भुवनदहनकाळीं काळ विक्राळ जैसा । सकळ गिळित ऊभा भासला भीम तैसा ।
दुपटत कपिं झोके झोंकिली मेदिनी हे । तळवट धरि धाकें धोकिली जाऊं पाहे ॥१॥
गिरिवरुनि उडाला तो गिरि गुप्त झाला । घसरत दश गांवे भूमिकेमाजि गेला ।
ऊडती झडझडाटें वृक्ष हे नेटपाटें । पडती कडकडाटें अंगघातें धुधाटें ॥२॥
थरथरित थरारी वज्र लांगूल जेव्हां । गरगरित गरारी सप्त पाताळ तेव्हां ।
फणिवर कमठाचे पृष्ठिशीं आंग घाली । तगटित पवनाची झेंप लंकेसि गेली ॥३॥
थरकत धरणी हे हाणतां वज्रपुच्छें । रगडित रणरंगीं राक्षसें तृणतुच्छें ।
सहज रिपुदळाचा थोर संहार केला । अवघड गडलंका शीघ्र जाळुन आला ॥४॥
सहज करतळें जो मेरुमांदार पाडी । दशवदन रिपु हे कोण कीती बराडी ।
अगणित गणवेना शक्ति काळासि हारी । पवनतनुज पाहा पूर्ण रुद्रावतारी ॥५॥
॥ भीमरूपी स्तोत्र संपूर्ण ॥८॥

**शब्दार्थ:- १]भुवनदहनकाळी-** लंकादहनाचे वेळी, २] **विक्राळ-** अत्यंत भयानक, ३] **गिळित**- गिळंकृत करीत असता ४] **दुपटत कपि झोके**- हनुमंत दुडक्या चालीने झोके घेऊ लागले ५] **झोंकिली**- डोलू लागली,झोके घेऊ लागली ६] मेदिनी- धरती,धरणी ७] **तळवट धरि धाके**- बूड,तळाचा भाग आपल्या धाकाच्या जोरावर धरुन ठेवतो ८] **भूमिकेमाजि**- नेमून दिलेल्या कामावर गेला ९] **नेटपाटें**- नेटाने,जोर लाऊन १०] **अंगघाते**- त्यांचा स्वतःचा घात होऊन, तोल जाऊन, ११] **धुधाटे**- वेगाने, जोराने १२] **कमठाचे**- कासवाचे, कुर्माचे १३] **पृष्ठिशी**- पाठी मागे १४] **तगटित**- लगेच, त्याचवेळी १५] **पवनाची**- पवनपूत्राची १६] **तृणतुच्छे**- कस्पटासमान, यःकश्चित १७] **करतळे** - तळहातावर १८] **बराडी**- भिकारी,दयनीय,अगतिक १९] **अगणित** -मोजदाद करता येणार नाही इतकी २०] **काळासि हारी**- मृत्युसही हरवतो,पराभूत करतो.

[९]

७] लघूशी परी मूर्ति हे हाटकाची । करावी कथा मारुतीनाटकाची ।
असावी सदा ताइतामाजि दंडीं । समारंगणीं पाठ दीजे उदंडी ॥१॥
ठसा हेमधातूवरी वायुसूतू । तथा ताइताचेपरी रौप्यधातू ।
तयाची पुजा मंदवारी करावी । बरी आवडी आर्त पोटी धरावी ॥२॥
स्वधामासि जातां प्रभू रामराजा । हनुमंत तो ठेविला याच काजा ।
सदा सर्वदा रामदासासि पावे । खळीं गांजितां ध्यान सोडून धांवे ॥३॥
॥ भीमरूपी स्तोत्र संपूर्ण ॥९॥

**शब्दार्थ:-१] लघूशी-** लहानशी, २] **हाटकाची-** सोन्याची,३] **दंडी-** दंडावर ४] **समारंगणी**-रणांगणी ५] **आर्त-** जिव्हाळा ६] **काजा-** कामासाठी, ७] **खळीं-** दुष्टाने ८] **गांजिता-** त्रास दिला तर.

[१०]

८] चपळ ठाण विराजतसे बरें । परमसुंदर तें रूप साजिरें ।
धगधगीत बरी उटि सिंदूरें । निकट दास कपी विर हें खरें ॥१॥
कपीवीर जेठी उडे चारि कोटि । गिरी द्रोण दाटी तळातें उपाटी ।
झपेटी लपेटी करी पुच्छवेटी । त्रिकूटाचळीं उठवी वीर कोटी ॥२॥
रघुविरा समिरात्मज भेटला । हरिजनां भजनांकुर फूटला ।
कपिकुळें सकळें मिनली बळे । रिपुदळें विकळें वडवानळें ॥३॥
कपीवीर तो लीन तल्लीन झाला । प्रसंगेंचि पाहोनि सन्मूख आला ।
हनुमंत हें पावला नाम तेथें । महीमंडळीं चालिलें सर्व येथें ॥४॥
नव्हें सौम्य हा भीम पूर्णप्रतापी । देहो आचळातुल्य हा कालरूपी ।
पुढें देखतां दैत्यकूळें दरारा । भुतें कांपती नाम घेतां थरारां ॥५॥
सिमा सांडिली भीमराजें विशाळें । बळें रेटिलें दैत्य कृतांत काळें ।
गजामस्तकीं केसरीचा चपेटा । महावीर तैसा विभांडी त्रिकूटा ॥६॥
॥ भीमरूपी स्तोत्र संपूर्ण ॥१०॥

**शब्दार्थ:-१] चारि कोटी-** चार प्रकारच्या योनितून सर्वत्र संचार, २] **समिरात्मज**-वायुपुत्र ३] **रिपुदळे-** शत्रुसैन्य ४] **सन्मूख-** समोर ५] **महिमंडळी-** या धरतीवर ६] **गजामस्तकी-** हत्तीचे मस्तकावर ७] **केसरी**-सिंह ८] **चपेटा**-हल्ला.

[११]

३] नमन गा तुज हे भिमराया । निजमती मज दे तुज गाया ।
तडकितां तडकी तडकाया । भडकितां भडकी भडकाया ॥१॥
हरुषला हर हा वरदानीं । प्रगटला नटला मज मानी ।
वदविता वदनीं वदवीतो । पुरवितो सदनीं पदवी तो ॥२॥
अवचितां चढला गडलंका । पळभरी न धरी मनिं शंका ।
तडकितां तडकी तडकीतो । भडकितां भडकी भडकीतो ॥३॥
खवळले रजनीचरभारें । भडकितां तडके भडमारें ।
अवचितां गरजे भुभुकारें । रगडिजे मग कां (गमकें) दळ सारें ॥४॥
कितियका खरडी खुरडीतो । कितियका नरडी मुरडीतो ।
कितियका चिरडी चिरडीतो । कितियका अरडी दरडीतो ॥५॥
बळि महा (महाबळी) रजनीचर आले । भिम भयानकसेचि मिळाले ।

रपटितां रपटी रपटेना । अपटितां अपटी अपटेना ॥६॥
खिजवितां खिजवी खिजवेना । झिजवितां झिजवी झिजवेना ।
रिझवितां रिझवी रिझवेना । विझवितां विझवी विझवेना ॥७॥
झिडकितां झिडकी झिडकेना । तडकितां तडकी तडकेना ।
फडकितां फडकी फडकेना । कडकितां कडकी कडकेना ॥८॥
दपटितां दपटीं दपटेना । झपटितां झपटी झपटेना ।
लपटितां लपटी लपटेना । चपटितां चपटी चपटेना ॥९॥
दवडितां दवडी दवडेना । घडवितां घडवी घडवेना ।
बडवितां बडवी बडवेना । रडवितां रडवी रडवेना ॥१०॥
कवळितां कवळी कवळेना । खवळिता खवळी खवळेना ।
जवळितां जवळी जवळेना । मळवितां मळवी मळवेना ॥११॥
चढवितां चढवी चढवेना । झडविता झडवी झडवेना ।
तडवितां तडवी तडवेना । गडवितां गडवी गडवेना ॥१२॥
तगटितां तगटी तगटेना । झगटितां झगटी झगटेना ।
लगटितां लगटी लगटेना । झकटितां झकटी झकटेना ॥१३॥
टणकितां टणकी टणकेना । ठणकितां ठणकी ठणकेना ।
दणगितां दणगी दणगेना । फुणगितां फुणगी फुणगेना ॥१४॥
चळवितां चळवी चळवेना । छळवितां छळवी छळवेना ।
जळवितां जळवी जळवेना । टळवितां टळवी टळवेना ॥१५॥
घसरितां घसरी घसरेना । विसरितां विसरी विसरेना ।
मरवितां मरवी मरवेना । हरवितां हरवी हरवेना ॥१६॥
उलथितां उलथी उलथेना । कलथितां कलथी कलथेना ।
उडवितां उडवी उडवेना । बुडवितां बुडवी बुडवेना ॥१७॥
बुकलितां बुकली बुकलेना । धुमसितां धुमसी धुमसेना ।
धरवितां धरवी धरवेना । सरविता सरवी सरवेना ॥१८॥
झडपितां झडपी झडपेना । दडपितां दडपी दडपेना ।
तटवितां तटवी तटवेना । फटवितां फटवी फटवेना ॥१९॥
वळवितां वळवी वळवेना । पळवितां पळवी पळवेना ।
ढळवितां ढळवी ढळवेना । लळवितां लळवी लळवेना ॥२०॥
घुरकितां घुरकी घुरकावी । थरकितां थरकी थरकावी ।
भरकितां भरकी भरकावी । झरकितां झरकी झरकावी ॥२१॥
परम दास हटी हटवादी । लगटला उतटी तटवादी ।
शिकवितां शिकवी शिक लावी । दपटितां दपटून दटावी ॥२२॥
॥ भीमरूपी स्तोत्र संपूर्ण ॥११॥

**शब्दार्थ :** **१]** निजमती- **स्वतःची बुद्धि २] तडकिता-** तडकला तर **३] भडकी-** भडकतो **४] हरुषला-** आनंदला **५] हर हा वरदानी-** वरदायक हनुमान ६] वदविता- बोलता झाला तर ७] **रजनीचरभारे**- रात्री भटकाणारे राक्षसगण ८] **रपटेना**- रपटत नाही ९] **चिरडी**- चिरडून टाकतो १०] **अरडी**-अडचणीच्या ठिकाणी गाठून ११] **अपटिता**-आपटायला जावे तर १२]**कलथिता**- कलथून टाकावे तर १३] बुकलिता - बुकलून काढावे तर १४] टीप- या स्तोत्रांत शब्दांची विशिष्ट प्रकारे पुनरावृती करुन एकप्रकारची चमकृतीजन्य खटकेदार लय निर्माण करण्याची श्रीसमर्थांची ही खासियत आहे. या रचनेतून त्यांचे भाषेवर किती प्रभूत्व आहे हे दिसून येते.त्यामुळे ते गुणगुणत राहावेसे वाटते.

[१२]

९] भिम भयानक तो शिक लावी । भडकला सकळां भडकावी ।
वरतरू वरतां तडकावी । बळकटा सकळां धडकावी॥१॥
सकळ ते रजनीचरभारे । सकट बांधत पुच्छ उभारे ।
रडत बोलती वीरच सारे । न दिसतांचि बळे भुभुकारे ॥२॥
जळतसे त्रिकुटाचळ लंका । धरितसे रजनीचर शंका ।
उमजती उमजे वरघाला । अवचितां बुडवी सकळांला ॥३॥
कठिण मार विरांस न साहे । रुधिरपुर महीवरि वाहे ।
बहुत भूत भुतावळि आली । रणभुमीवरि येउनि घाली॥४॥
अमर ते म्हणती विर-आला । नवल हें पुरलें सकळांला।
उदित काळ-बरा दिसताहे । विधिविधान विधी मग पाहे॥५॥
॥ भीमरूपी स्तोत्र संपूर्ण ॥१२॥

**शब्दार्थ: १] सकट-** सर्वांना, २] **भुभुकारे-** भुभु असा आवाज करतो ३] **रुधिरपुर**-रक्ताचे पाट ४] विधिविधान- ब्रह्मदेव

[१३]

१०] बळें सर्व संहारिले रावणाला । दिले अक्षयीं राज्य बीभीषणाला ।
रघुनायकें देव ते मुक्त केले । अयोध्यापुरा जावया सिद्ध जाले ॥१॥
पथामाजि कृष्णातिरीं रामराया । घडे राहणें स्नानसंध्या कराया ।
सिता राहिली शीरटें गाव जेथें । रघुराज तो पश्चिमेचेनि पंथें ॥२॥
जपध्यान पूजा करी रामराजा । तयाचेपरी वीर सौमित्र वोजा ।
स्मरेना देहीं चित्त ध्यानस्थ जाले । अकस्मात तें तोय अद्भुत आलें ॥३॥
बळें चालिला ओघ नेटें भडाडां । नभीं धांवती लोट लाटा धडाडां ।
नदी चालली राम ध्यानस्थ जेथें । बळें विक्रमें पावला भीम तेथें ॥४॥
उभा राहिला भीमरूपी स्वभावें । बळें तुंब तो तुंबिला दोन गांवें ।
नदी एक वीभागली दोन्हि बाहें । म्हणोनि तया नाम हें (गांव) ऊर्णबाहे ॥५॥
सुखे लोटती देखतां रामलिंगा । बळें चालिली भोंवतीं कृष्णगंगा ।
परी पाहतां भीम तेथें दिसेना । उदासीन हें चित्त कोठें वसेना ॥६॥
हनूमंत पहावयालागिं आलों । दिसेना सखा थोर विस्मीत जालों ।
तयाविण देवालयें ती उदासे । जळांतून बोभाइलें (दासदासे) रामदासें ॥७॥
मनांतील जाणोनि केला कुडावा । दिले भेटिचा जाहला थोर यावा ।
बळें हांक देतांचि तैसा गडाडी । महामेघ गंभीर जैसा घडाडी ॥८॥
रघुराज वैकुंठधामासि गेले । तधीं मारुती दास हे नीरवीले ।
रघुनाथ ऊपासकाला प्रसंगे । सख्या मारुती पाव रे लागवेगें ॥९॥
प्रभूचें महावाक्य त्वां साच केलें । म्हणे दास हे प्रत्यया सत्य आलें ।
जनामाजि हें सांगतां पूरवेना । अवस्था मनीं लागली हे सरेना ॥१०॥
॥ भीमरूपी स्तोत्र संपूर्ण ॥१३॥
॥ त्रयोदश भीमरुपी मारुती-स्तोत्रें समाप्त ॥

**शब्दार्थ: १] अक्षयी-** कधिही न संपणारे, **२]सौमित्र**-लक्ष्मण, **३] वोजा**-शुद्ध मनाचा,निर्मळ, **४] कुडावा-** रक्षण, **५] लागवेगे** -तात्काळ, **६] नीरवीले-** शांत केले.

**टीप:- सदरची १३ भीमरुपी मारुती स्तोत्रे स.भ. पु.ज्ञा.कुलकर्णी,पुणे यानी मु.बॅटन रुझ, लुइझियाना युएसए येथे मंगळवार दि.१७-डिसेंबर २०१३ शब्दार्थासह लिहून पूर्ण केली.**